**आरे कॉलनीतील मेट्रो ३-च्या कारशेडकरीता सद्यस्थितीत निश्चित करण्यात आलेल्या जागेवर पर्यावरणीय समतोल साधणे, कारशेडचे बांधकाम करणे व त्या परिसरातील वृक्षसंपदा जतन करणे याबाबतचा अहवाल सादर करण्याकरीता समिती गठित करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३१९/प्र.क्र.७८(भाग-८)/नवि-७,**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : ११ डिसेंबर, २०१९.

**प्रस्तावना :-**

मुंबई मेट्रो मार्ग-३ कुलाबा-वांद्रे-सिप्झ या भुमिगत मेट्रो मार्गिकेकरिता बांधण्यात येणाऱ्या आरे कॉलनीमधील मेट्रो कार शेडबाबत मा. सर्वोच्च न्यायालय, दिल्ली येथे सु-मोटो रिट याचिका (सिव्हील) क्र. २/२०१९ प्रलंबित असून त्या अनुषंगाने शासनाची भुमिका मा. सर्वोच्च न्यायालयात सादर करावयाची असल्याने सद्यस्थितीत आरे कॉलनीतील मेट्रो-३ करीता निश्चित करण्यात आलेल्या कारशेडच्या जागेवरील उर्वरित झाडे तोडणे आणि त्याअनुषंगाने पुढील इतर कोणतीही कार्यवाही शासनाचे पुढील आदेश होईपर्यंत करण्यात येऊ नये, असे मुंबई मेट्रो रेल कार्पोरेशन लिमिटेड (MMRCL) यांना दि. २९ नोव्हेंबर २०१९ च्या पत्रान्वये कळविण्यात आलेले आहे. प्रस्तुत प्रकरणी मा. सर्वोच्च न्यायालयात शासनाची योग्य भुमिका मांडणे त्याचबरोबर मेट्रो-३ प्रकल्पाचे काम नियमानुसार निश्चित केलेल्या कालावधीत पुर्ण करण्याची आवश्यकता विचारात घेऊन आरे कॉलनीतील मेट्रो-३ च्या कारशेडकरीता सद्यस्थितीत निश्चित करण्यात आलेल्या जागेवर पर्यावरणीय समतोल साधणे, कारशेडचे बांधकाम करणे व त्या परिसरातील वृक्षसंपदा जतन करणे याबाबतचा अहवाल सादर करण्याकरीता एक समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

मुंबई मेट्रो मार्ग-३ कुलाबा-वांद्रे-सिप्झ या भुमिगत मेट्रो मार्गिकेकरिता बांधण्यात येणाऱ्या आरे कॉलनीमधील मेट्रो कार शेडबाबत मा. सर्वोच्च न्यायालय, दिल्ली येथे सु-मोटो रिट याचिका (सिव्हील) क्र. २/२०१९ प्रकरणी मा. सर्वोच्च न्यायालयात शासनाची योग्य भुमिका मांडणे त्याचबरोबर मेट्रो-३ प्रकल्पाचे काम नियमानुसार निश्चित केलेल्या कालावधीत पुर्ण करण्याची आवश्यकता विचारात घेऊन आरे कॉलनीतील मेट्रो-३ च्या कारशेडकरीता सद्यस्थितीत निश्चित करण्यात आलेल्या जागेवर पर्यावरणीय समतोल साधणे, कारशेडचे बांधकाम करणे व त्या परिसरातील वृक्षसंपदा जतन करणे याबाबतचा अहवाल सादर करण्याकरीता मा. अपर मुख्य सचिव (वित्त) यांच्या अध्यक्षतेखाली पुढीलप्रमाणे समिती गठित करण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| १. | अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई. | अध्यक्ष |
| २. | प्रधान सचिव (पर्यावरण), पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ३. | व्यवस्थापकीय संचालक, मुंबई रेल विकास महामंडळ (MRVC) मुंबई रेल्वे विकास महामंडळ, चर्चगेट, मुंबई. | सदस्य (तांत्रिक) |
| ४. | श्री. अन्वर अहमद, मुख्य वन संरक्षक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली, मुंबई. | सदस्य (वन तज्ञ) |

०२. सदर समितीने खालील बाबींचा सर्वंकष विचार करुन १५ दिवसांमध्ये शासनास अहवाल सादर करावा.

अ) मेट्रो-३ प्रकल्पाच्या कारशेडकरीता सद्यस्थितीत निश्चीत केलेल्या जागेऐवजी पर्यावरणीयदृष्ट्या योग्य व वाजवी किंमतीमध्ये पर्यायी जागा उपलब्ध आहे किंवा कसे ?

ब) सद्यस्थितीत आरे कॉलनीतील मेट्रो-३ कारशेडचे काम करताना त्या जागेवरील २१०० झाडांची कापणी करण्यापूर्वी विहीत पध्दतीचा अवलंब केला होता का ?

क) आरे कॉलनीमधील जमिनीच्या पर्यावरण रक्षणासाठी काय उपाययोजना करणे आवश्यक आहे ?

०३. सदर समितीस आवश्यक ते सहकार्य करण्यास व्यवस्थापकिय संचालक, मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. वांद्रे (पूर्व), मुंबई यांनी संबंधितांना सूचना देण्यात याव्यात.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९१२१११११३८५०८९२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vishnu
Shripati Patil

Digitally signed by Vishnu Shripati Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=21ebe4508a75a767041512feeaa6b8f2d5bc8caf857fe02cd29ce4bbb772da09,
serialNumber=f8a0fc598f692587efafe9bd62df9e449fdf81c803c27adf1782c97c76ebcba5, cn=Vishnu Shripati Patil
Date: 2019.12.11 15:08:34 +05'30'

**( विष्णू पाटील )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल महोदयांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४. मा. सचिव, केंद्रीय गृहनिर्माण व शहर विकास मंत्रालय, नवी दिल्ली.
५. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, गृह निर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

९. प्रधान सचिव (पर्यावरण), पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. प्रधान सचिव (पदुम), पशु संवर्धन दुग्ध विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
१३. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, वांद्रे (पूर्व), मुंबई.
१४. व्यवस्थापकिय संचालक, मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि., वांद्रे (पूर्व), मुंबई.
१५. व्यवस्थापकिय संचालक, मुंबई रेल्वे विकास कॉर्पोरेशन लि. चर्चगेट, मुंबई.
१६. मुख्य वन संरक्षक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली, मुंबई.
१७. जिल्हाधिकारी (मुंबई शहर), मुंबई.
१८. जिल्हाधिकारी (मुंबई उपनगरे), वांद्रे (पूर्व), मुंबई.
१९. उप सचिव तथा उप संचालक, नगर रचना, नगर विकास विभाग (नवि-११), मंत्रालय, मुंबई.
२०. उप सचिव, नगर विकास विभाग (नवि-७), मंत्रालय, मुंबई.
२१. निवड नस्ती (नवि-७).